शैक्षणिक वर्ष : १६-२०१५
नवीन महाविद्यालयांना मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्रमांकः एनजीसी २०१४/(१११/१४)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ९ सप्टेंबर, २०१४.

<u>संदर्भ</u> -

१) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २०१०/(१९३/१०)/मशि-४,दि. ३० ऑक्टोंबर २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २०१२/(२४७/१२)/मशि-४, दि. २ सप्टेंबर २०१३.
३) संचालक, बी.सी.यु.डी., डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. शैक्ष/संलग्न/२०१३-२०१४/२८२५-२८, दि. २८.४.२०१४.

**शासन आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ मधील तरतुदीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी नवीन महाविद्यालयांना मान्यता देण्याचे प्रस्ताव शासनास सादर करावयाचे असतात. त्यानुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये नॅशनल एज्युकेशन सोसायटी, सिल्लोड या संस्थेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. विद्यापीठाने सदर प्रस्ताव शिफारशीत करताना तालुक्यात २ महाविद्यालये कार्यरत असून तालुक्यातील महाविद्यालयावर विपरित परिणाम होणार नाहीत. असे नमूद केलेले आहे. ही बाब तसेच विद्यापीठाची शिफारस विचारात घेऊन पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नॅशनल एज्युकेशन सोसायटी, सिल्लोड या संस्थेस कायम विना अनुदान तत्वावरील नवीन महाविद्यालय सुरू करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून इरादा पत्र (Letter of Intent) देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव व ठिकाण | अभ्यासक्रम/विद्याशाखा |
|---|---|---|---|
| **डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा औरंगाबाद विद्यापीठ, औरंगाबाद** | | | |
| १ | नॅशनल एज्युकेशन संस्था, सिल्लोड | नॅशनल कला व विज्ञान महाविद्यालय, फर्दापूर | **कला**<br>**विज्ञान** |

अटी व शर्ती:-

१. नॅशनल कला व विज्ञान महाविद्यालय, फर्दापूर या मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयाने त्यांच्या संबंधित विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
२. महाविद्यालयाने शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतर आवश्यक ते हमीपत्र संबंधित विभागीय सहसंचालकांकडे सादर करावे व संबंधित विभागीय सहसंचालकांकडून वरील हमीपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
३. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.
४. ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून लागू होणार असल्याने देण्यात येत असलेले इरादा पत्र हे फक्त ३१ मार्च २०१५ पर्यंतच वैध राहील. तत्पुर्वी शासनाची अंतिम मान्यता घेणे आवश्यक राहील.

५. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

नॅशनल कला व विज्ञान महाविद्यालय, फर्दापूर हे महाविद्यालय शासन निर्णय दि. २.९.२०१३ मधील निकष पुर्ण करीत असल्याच्या अधीन राहून इरादा पत्र (Letter of Intent) देण्यात येत आहे. सदर अटीची पुर्तता महाविद्यालयाने ३१ जानेवारी २०१५ पुर्वी केली असल्याची खातरजमा बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद व विभागीय सहसंचालक, औरंगाबाद यांनी करून त्याबाबतचा अहवाल १५ फेब्रुवारी २०१५ पुर्वी शासनास सादर करणे आवश्यक राहील. प्राप्त झालेला अहवाल विचारात घेऊन १५ मार्च २०१५ पर्यंत शासनाकडून अंतिम मान्यता (Letter of Approval) प्रदान करण्यात येईल. शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतरच विदयापीठांनी संलग्निकरणाबाबतची कार्यवाही सुरू करावी.

बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद व विभागीय सहसंचालक, औरंगाबाद यांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयाचा नियतकालिक आढावा घेऊन सदर नवीन महाविद्यालयामध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर नवीन महाविद्यालयाची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१२०२१२४४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nivruti Bhaguji Marale

Digitally signed by Nivruti Bhaguji Marale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nivruti Bhaguji Marale
Date: 2014.09.09 16:53:40 +05'30'

नि.भा. मराळे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, औरंगाबाद
४. संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५. निवड नस्ती (मशि-४)